घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबत
**डॉ. जितेंद्र एस. रामगावकर, भावसे,**
**उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.एएफओ-१५१९/प्रक्र. १५५/फ-७अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई.४०००३२.
दि. २३ ऑक्टोबर, २०१९.

वाचा :-

१) केंद्र शासनाचे ज्ञापन क्र.१७०११/११(४)/२०१६-एच-III. दि.९.११.२०१७.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२०.२.२०१५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२४.४.२०१९.
४) महसूल व वन विभागाचे ज्ञापन क्र.घबांअ-२०१९/७६१०/प्रक्र.१४५/ब-१, दि.१८.१०.२०१९.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) यांचे पत्र क्र. कक्ष-९ /सीसी/ घबांअ / प्रक्र२८/ भाग-२/१८४५ /१९-२० , दि. २०.०९.२०१९

प्रस्तावना :-

डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे, उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांनी नागपूर स्थित, महिंद्रा ब्लूमडेल डेव्हलपर्स लि., मिहान सेझ डीनोटीफाईड एरीया , डी. वाय. पाटील इंटरनॅशनल स्कूल जवळ, खापरी, नागपूर ४४११०८ यांचेकडून नवीन सदनिका घेण्यासाठी रु.६०,००,०००/- (अक्षरी रुपये साठ लक्ष फक्त) एवढे घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबत केलेल्या विनंतीनूसार संदर्भाधीन प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) यांचे दि. २०.०९.२०१९ रोजीच्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार उपलब्ध असलेली अर्थसंकल्पीय तरतूद विचारात घेऊन डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे यांना घरबांधणी अग्रिम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

डॉ.जितेंद्र रामगावकर, हे सन २००६ च्या तुकडीतील भावसे अधिकारी असून सद्यस्थितीत उप वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे या पदावर कार्यरत आहेत. तसेच त्यांचे मूळ वेतन रु.९१,४००/- इतके असून डॉ.रामगावकर, भावसे यांची १२ वर्षापेक्षा जास्त कालावधीची शासन सेवा झालेली आहे. ते दि.३१.५.२०४१ मध्ये सेवानिवृत्त होणार आहेत. म्हणजेच त्यांची सेवा २० वर्षापेक्षा जास्त बाकी आहे. त्यांनी नागपूर स्थित, मिहान सेझ डीनोटिफाईड एरीया, डी. वाय. पाटील इंटरनॅशनल

स्कूल जवळ, खापरी, नागपूर ४४१ १०८ येथे बांधकाम सुरू असलेल्या महिंद्रा ब्लूमडेल डेव्हलपर्स लि., यांचेकडून नवीन सदनिका घेण्यासाठी घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबत दि. ०९.१०.२०१९ रोजीच्या अर्जान्वये विनंती केली आहे. सदर सदनीका ३ बीएचके असून ८६.७९ स्क्वेअर यार्ड मीटर (७८१ स्क्वेअर फूट) इतक्या क्षेत्रफळाची आहे व या सदनिकेची अंदाजे किंमत रु.७५,००,०००/- इतके असल्याचे नमूद केले आहे. तसेच त्यांनी अर्जासोबत मुंबई वित्तीय नियम १९५९ , परिशिष्ट २६ अनुसार फॉर्म ए२ आणि सदनिकेच्या खरेदीच्या किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. तसेच त्यांची पत्नी शासकीय नोकरीत नसल्याचे कळविले आहे.

२. त्यानूसार महसूल व वन विभागाच्या **ब-१** या कार्यासनाच्या संदर्भाधीन ज्ञापन क्र.घबांअ-२०१९/७६१०/प्रक्र.१४५/ब-१, दि.१८.१०.२०१९ अन्वये निधी उपलब्ध प्रमाणपत्र प्राप्त झाले आहे.

३. डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे यांनी घरबांधणी अग्रीम मंजूर करण्यासाठी केलेल्या विनंतीनुसार व ब-१ कार्यासनाकडून प्राप्त झालेल्या निधी उपलब्ध प्रमाणपत्रानुसार प्रचलीत नियमाप्रमाणे त्यांना रु.३०,००,०००/- इतकी रक्कम घरबांधणी अग्रीम म्हणून अनुज्ञेय होत आहे. सदर सदनिकेचे बांधकाम अद्याप चालू असल्याने प्रचलीत नियमानुसार त्यांना खालील अटी व शर्तीवर उक्त अग्रिम तीन समान हप्त्यांमध्ये अदा करण्यास मान्यता देण्यात येत असून रु. ३०,००,०००/- (रुपये तीस लाख फक्त) पैकी प्रथम हप्ता रु. १०,०००,०० (रूपये दहा लाख फक्त) अदा करण्यास मंजूरी देण्यात येत असून उर्वरीत रक्कम रु.२०,००,०००/- (रुपये वीस लाख फक्त) बांधकामाच्या प्रगतीप्रमाणे मंजुर करण्यास याव्दारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

१. डॉ. रामगावकर, भावसे यांना मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील परिशिष्ट २६ मधील अटी व शासनाने यामध्ये वारंवार केलेल्या सुधारणा तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.घबांअ-१०८७(४६५) /विनियम, दि. ६.११.१९९० तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२०.२.२०१५ मधील विहित नियम/अटींचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अधिन राहून अग्रिम मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर घरबांधणी अग्रीमाची रु.३०,००,०००/- इतक्या रक्कमेवर शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराने व्याज आकारण्यात यावे. डॉ. रामगावकर, भावसे यांना

मंजूर केलेल्या अग्रीमाची मूळ रक्कमेची वसुली दरमहा रु.१५६२५/- प्रमाणे एकुण १९२ मासिक हप्त्यात व त्यानंतर व्याजाच्या रक्कमेची वसूली ४८ मासिक हप्त्यात करण्यात यावी. अग्रीमाच्या वसुलीची सुरुवात ज्या महिन्यामध्ये प्रत्यक्ष अग्रीम मिळेल त्याच्या पुढील महिन्यापासून करण्यात यावी.

३. घरबांधणी अग्रीमाच्या मुद्दलाची रक्कम अगर त्यावरील व्याजाची रक्कम डॉ.रामगावकर यांच्या सेवाकाळात पूर्णत: न झाल्यास, वसुल व्हावयाची सर्व शिल्लक रक्कम त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर त्यांना मिळणाऱ्या मुत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदानाच्या रक्कमेतून अथवा परिभाषीत अंशदायी योजनेच्या रकमेतून वसूल करण्यासंदर्भात संमती पत्र घेण्यात यावे.

४. डॉ. रामगावकर, भावसे यांना अग्रीमाची रक्कम प्रत्यक्ष प्रदान करताना मुंबई वित्तीय नियम १९५९ मधील परिशिष्ट २६ अंतर्गत करारनाम्याची प्रत, नोंदणीकृत गहाण खत (प्रपत्र बी-२) प्राप्त करून घेण्यात यावे व त्यांच्या अभिलेख्यात जतन करावे. तसेच मंजूर करण्यात आलेल्या अग्रिमाबाबत त्यांच्या सेवा पुस्तकात नोंद घेण्यात यावी.

५. डॉ. रामगावकर, भावसे यांनी खरेदी केलेल्या सदनिकेचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविणे व अग्रीमाची व्याजासह परतफेड होईपर्यंत तो विमा चालू ठेवणे आवश्यक राहील.

६. व्याजाबाबत अन्य आदेश निर्गमित होईपर्यंत शासन निर्णय, वित्त विभाग क्र.घबांअ-२०१२/प्रक्र.३०/२०१२/विनियम, दि.२०.२.२०१५ मध्ये नमूद केलेला व्याजाचा दर व त्यामधील नमूद केलेल्या पध्दतीनुसार व्याजाची परिगणना करण्यात यावी. तसेच डॉ. रामगावकर, यांनी त्यांना मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमाच्या परतफेडीची सुरुवात विहित मुदतीत न केल्यास अग्रीमाच्या थकीत हप्त्याच्या रक्कमेच्या प्रचलित नियमातील तरतुदीनुसार दंडनीय व्याज आकारण्यात यावे.

७. तसेच त्यांना ज्या प्रयोजनाकरीता अग्रिम मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग न केल्यास किंवा अग्रिम व व्याज परतफेडीच्या

संदर्भातील अटी व शर्तीचे पालन न केल्यास किंवा त्यात कोणत्याही प्रकारची कसूर झाल्यास, प्रचलीत व्याजदर +२.७५ टक्के दंडनीय व्याजासह अग्रिमाची एक रकमी वसूली करण्यात यावी. याकरीता डॉ. रामगावकर यांनी तीन महीन्याच्या आत घर खरेदीची सर्व कागदपत्रे व अग्रिम विनियोगाचा पुरावा सादर करावा.

८. डॉ. रामगावकर, भावसे हे घरबांधणी अग्रिम रकमेच्या नियमिय व योग्य वसूली साठी स्वतः जबाबदार रहातील. तसेच ते अनधिकृत रजेवर राहिल्यास अथवा इतर कोणत्याही कारणास्तव कर्तव्यापासून दूर राहील्यास किंवा अन्य विभागात बदली अथवा प्रतिनियुक्तीने गेल्यास घर बांधणी अग्रिमाची नियमित परतफेड करण्यास व्यक्तीशः जबाबदार रहातील.

९. डॉ. रामगावकर, भावसे यांना मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमाची रक्कम ज्या कोषागारातून काढण्यात येईल त्याचे नाव, प्रमाणक क्रमांक, धनादेश क्रमांक व रक्कम प्रत्यक्ष वितरीत केल्याची तारीख याबाबतची माहिती कक्ष अधिकारी, फ-७अ कार्यासनास व सहायक संचालक (भावसे/लेखा) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळवावी.

१०. यावर होणारा खर्च " मागणी क्र.सी-१२-७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज-२०१-घरबांधणी अग्रिमे-(००)-(०१) घरबांधणी अग्रीम (७६१० ०१४९) " या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व तो सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

११. डॉ. रामगावकर, भावसे यांना मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमाची रक्कम संवितरीत न केल्यास अग्रीमाच्या त्यांच्या मागणीचा विचार पुढील आर्थिक वर्षामध्ये इतर सर्व पात्र अधिकाऱ्यांच्या घरबांधणी अग्रीमाच्या मागणीनंतर करण्यात येईल व याद्वारे रद्द केलेला निधी व्यपगत झाला असे समजण्यात येईल.

४. प्रस्तुत शासन निर्णय ,वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१/विनियम, भाग-२, दि, १७/०४/२०१५ अन्वये सुधारीत करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग एक मधील मुंबई वित्ती नियम १९५९ अंतर्गत नियमांखालील अनुक्रमांक ११ मधील नियम क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१०२३१३००३२९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND FD,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.10.23 13:02:37 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे,
५. उपवनसंरक्षक, ठाणे वन विभाग , ठाणे,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,
७. डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे, उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे,
८. कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सहायक संचालक, भावसे (लेखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी, डॉ. जितेंद्र रामगावकर, भावसे उपवनसंरक्षक (प्रा.), ठाणे यांचे सेवापुस्तकात आवश्यक त्या नोंदी न चूकता घ्याव्यात.
१०.संचालक, विमा संचालनालय, मुंबई,
११.डॉ.जितेंद्र रामगावकर, भावसे यांचे वैयक्तीक नस्ती,
१२.निवड नस्ती, फ-७ अ कार्यासन.